राजपत्रित अधिका-यांची वयाची ५०/५५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर अथवा ३० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण झाल्यानंतर करावयाचे पुनर्विलोकन— विशेष पुनर्विलोकन समित्या व अभिवेदन समित्यांनी केलेल्या शिफारशींवर निर्णय घेण्याबाबत. . . .

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्र. एसआरसी-१०८९/प्र. क्र. ३३/८९/१५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, १९९०

संदर्भ:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरसी-१०८९/प्र. क्र. ३३/पंधरा., दि. २२. ८. ८९

परिपत्रक-

शासकीय विभागातील वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण झाल्यानंतर करावयाच्या पुनर्विलोकनाची प्रकरणे कोणत्या पुनर्विलोकन समितीला सादर करावी, व पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीच्या आधारे घेतलेल्या निर्णयाबाबतचे अभिवेदन कोणत्या अभिवेदन समितीला सादर करावे व त्यानंतर शासन निर्णय कोणत्या स्तरावर घेण्यात यावा इत्यादीबाबत संदर्भाधीन परिपत्रकान्वये आदेश देण्यात आले आहेत.

२. शासन निर्णय, सा. प्र. वि. क्रमांक-ईएसबी-१०८९/प्र. क्र. ३७/८९/१३, दिनांक ११. १२. ८९ अन्वये आस्थापना मंडळ क्र. १ व आस्थापना मंडळ क्र. २ यांच्या कामात सुधारणा करण्यात आल्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. हे आदेश लक्षात घेऊन शासकीय विभागामधील वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या पुनर्विलोकनाची प्रकरणे खाली नमूद केल्याप्रमाणे विशेष पुनर्विलोकन समित्यांना व अभिवेदन समित्यांना सादर करण्यात यावीत आणि त्यांनी केलेल्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी खाली नमूद केलेल्या तक्त्यातील स्तंभ ४ व स्तंभ ५ नुसार संबंधित मंत्री महोदयांना सादर करण्यात याव्यात.

सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, वर्ग १ च्या अधिकाऱ्यांची प्रकरणे पुनर्विलोकनासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवितांना अधिकाऱ्यांची सुधारित वेतनश्रेणी न चुकता नमूद करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

मु. स. मोकाशी

[ मु. स. मोकाशी ]

महा सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,

मुख्यमंत्री यांचे सचिव,

सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,

सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,

मंत्रालयीन विभागातील सर्व सचिव,

विशेष पुनर्विलोकन समिती क्र. १, २ व ३ ह्यांचे सचिव.

*************